

# महाराष्ट्र शासन

## इतर मागास बहुजन कल्याण विभाग,

नविन प्रशासकीय भवन इमारत, ३ रा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२८२३८२१ ई-मेल -shrinath.hendre@nic.in

क्रमांक-आस्थाप्र- २०२२/प्र.क्र. १५/आस्था-२ दिनांक : ०८ एप्रिल, २०२२.

प्रति,

सह/उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**विषय :-** इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील विविध संवर्गातील पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता समकक्ष वेतनश्रेणीतील अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून इच्छुकता मागविण्याबाबत.

**संदर्भ**-१. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०१७/ प्र.क्र.०८/आस्थापना-२, दि. १४/१/२०२१

२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०१७/ प्र.क्र.०८/ आस्थापना-२, दि. २२/३/२०२२

३. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०२२/ प्र.क्र.१२/ आस्थापना-२, दि. २२/३/२०२२

४. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०२२/ प्र.क्र.१४/ आस्थापना-२, दि.२४/३/२०२२

महोदय / महोदया,

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या संदर्भाधिन क्र. १ येथील दि. १४/१/२०२१ च्या शासन निर्णयान्वये विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. तसेच, संदर्भाधिन क्र.२ येथील दि.२२/३/२०२२ च्या शासन निर्णयान्वये ‘सहायक संचालक’ -समाजकल्याण निरिक्षक॰ या पदांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्यात आली असुन ‘प्रकल्प अधिकारी’ संवर्गातील १३ पदांचा समावेश सुधारीत आकृतिबंधामध्ये करण्यात आला आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील मंजूर संवर्गातील पदांचे कर्तव्य व जबाबदाऱ्या तसेच वेतनश्रेण्या हया या विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील मंजूर संवर्गातील पदांसारख्याच आहेत. सदर बाब विचारात घेऊन या विभागाच्या संदर्भाधिन क्र. ३ येथील दि. २२/३/२०२२ च्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील संवर्गातील पदांना लागू असलेले सेवाप्रवेश नियम या विभागाच्या समकक्ष असलेल्या पदांना लागू करण्यात आले आहेत. तसेच, मंजूर करण्यात आलेल्या सुधारीत आकृतिबंधामधील काही पदांची नावे ही समाजकल्याण विभाग किंवा सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील सवंर्गातील पदनामाशी साधर्म्य असल्याचे दिसून येत असल्याने आणि परिणामी इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे नावाशी साधर्म्य नसल्याचे दिसून येत असल्याने त्यामध्ये संदर्भाधिन क्र.४ येथील दि. २४/३/२०२२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे.

इतर मागास बहुजन कल्याण विभागाची क्षेत्रिय स्तरावरील कार्यालये तातडीने सुरु करण्याचे निर्देश आहेत. त्यानुषंगाने पदभरतीसाठी सेवाप्रवेश नियम तयार होऊन नियमित पदभरती होईपर्यत, क्षेत्रिय स्तरावरील खालील पदे प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत.-

| अ.क्र. | इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील संवर्ग पद | दि.१४/१/२०२१ च्या शासन निर्णयानुसार मंजूर पदे | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर |
|---|---|---|---|
| १ | सहायक संचालक<br>(प्रत्येक जिल्हयाकरीता १ पद प्रमाणे ३६ पदे, तसेच इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे कार्यालयातील २ पदे ) | ३८ | एस-१८-४९१००-१५५८०० |
| २ | प्रकल्प अधिकारी<br>(पुणे, सोलापूर, सांगली, जळगाव, औरंगाबाद, बीड, परभणी, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर या जिल्हयांकरीता प्रत्येकी १ पद याप्रमाणे एकूण १२ पदे आणि इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे कार्यालयातील १ पद) | १३ | एस-१८-४९१००-१५५८०० |
| २ | संशोधन अधिकारी<br>(म.रा. मागासवर्ग आयोग, पुणे कार्यालयातील १ पद) | १ | एस-१८-४९१००-१५५८०० |
| ३ | जनसंपर्क अधिकारी<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १ पद) | १ | एस-१६:४४९००-१४२४०० |
| ४ | शिक्षण अधिकारी- वर्ग-२<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १ पद) | १ | एस-१५:४१८००-१३२३०० |
| ५ | इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी, गट-ब<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १ पद, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी १ पद, प्रत्येक जिल्हयाकरीता १ पद प्रमाणे ३६ पदे ) | ४४ | एस-१५:४१८००-१३२३०० |
| ६ | लघुलेखक (उच्चश्रेणी)<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील २ पदे, तसेच, म.रा. मागासवर्ग आयोग, पुणे कार्यालयातील २ पदे ) | ४ | एस-१५:४१८००-१३२३०० |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | कार्यालय अधिक्षक (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील ३ पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील प्रत्येकी १ पद, म.रा. मागासवर्ग आयोग, पुणे कार्यालयातील १ पद) | ११ | एस-१४:३८६००-१२२८०० |
| ८ | वरिष्ठ निरिक्षक (इतर मागास बहुजन कल्याण) (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १ पद, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी १ पद, | ८ | एस-१४:३८६००-१२२८०० |
| ९ | लघुलेखक (निम्नश्रेणी) (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील २ पदे) | २ | एस-१४:३८६००-१२२८०० |
| ११ | निरिक्षक (इतर मागास बहुजन कल्याण) (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील २ पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी २ पदे, जिल्हास्तरीय/सहायक संचालक कार्यालयाकरीता प्रत्येकी ३ याप्रमाणे एकूण १०८ पदे) | १२४ | एस-१३: ३५४००-११२४०० |
| १२ | प्रमुख लिपिक (इ.मा.ब.कल्याण संचालनालय, पुणे कार्यालयातील ५ पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी १ पद) | १२ | एस-१३: ३५४००-११२४०० |
| १३ | वरिष्ठ लिपिक (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील ६ पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी १ पद, जिल्हास्तरीय/ सहायक संचालक कार्यालयाकरीता प्रत्येकी १ पद) | ४९ | एस-८: २५५००-८११०० |
| १४ | कनिष्ठ लिपिक (इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १२ पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, | १०० | एस-६: १९९००-६३२०० |

| | | | |
|---|---|---|---|
| | औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी २ पदे, जिल्हास्तरीय/ सहायक संचालक कार्यालयाकरीता प्रत्येकी २ पदे, म.रा. मागासवर्ग आयोग, पुणे कार्यालयातील २ पदे ) | | |
| १५ | वाहन चालक<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील २ पदे) | २ | एस-६: १९९००-६३२०० |
| १६ | शिपाई<br>(इ.मा.ब.कल्याण संचालनालय,पुणे कार्यालयातील १० पदे, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, अमरावती, नाशिक, औरंगाबाद, लातुर येथील कार्यालयातील प्रत्येकी २ पदे, जिल्हास्तरीय/ सहायक संचालक कार्यालयाकरीता प्रत्येकी २ पदे, म.रा. मागासवर्ग आयोग, पुणे कार्यालयातील १ पद ) | ९७ | एस-१: १५०००-४७६०० |

त्यानुषंगाने आपणास विनंती करण्यात येते की, उपरोक्त नमूद पदांवर प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या अधिनस्त कार्यालयांतील समकक्ष वेतनश्रेणीतील अधिकारी/कर्मचाऱ्यांची नावे, त्यांचे मागील पाच वर्षाच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data) संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी माहिती या विभागाकडे दि.३०/४/२०२२ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास 'निरंक' असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४१११११५२३६८०३४ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

HENDRE SHRINATH VASANT

Digitally signed by HENDRE SHRINATH VASANT
DN: CN = HENDRE SHRINATH VASANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2022.04.11 12:13:40 +05'30'

**( श्रीनाथ व. हेंद्रे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत- विवरणपत्र**

विवरणपत्र

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय | |
|---|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | | |
| २ | जन्मदिनांक | | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | | |
| ४ | भ्रमणध्वनी क्रमांक | | |
| ५ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | | |
| ६ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | | |
| ७ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | | |
| ८ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत | पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
| | | | |
| | | | |
| | | एकूण कालावधी | |
| ९ | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | | |
| १० | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | | |
| ११ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | | |